**श्री. आर. आर.पाटील, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांची बदलीने पदस्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन आदेश क्र.सकआ २०२०/प्र.क्र.१११/आस्था-२,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०२ मे, २०२२.

<u>वाचा</u>:- १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन आदेश क्रमांक सकआ २०२०/प्र.क्र.१११/ आस्था-२, दि. १६ डिसेंबर, २०२०.

२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन आदेश क्रमांक सकआ २०२०/प्र.क्र.१११/ आस्था-२, दि.१ मार्च २०२१

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन आदेश क्रमांक सकआ २०२०/प्र.क्र.१११/ आस्था-२, दि.२६ ऑक्टोबर, २०२१

**<u>आदेश</u>**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील समाज कल्याण अधिकारी व तत्सम गट-ब (सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.४४००) या संवर्गातील १५ अधिकाऱ्यांना सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ (सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.५०००) या संवर्गात तात्पुरत्या स्वरुपात शासन आदेश समक्रमांक दि.१६ डिसेंबर, २०२० अन्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे.

२. श्री. आर.आर. पाटील यांना दि.१६.१२.२०२० च्या आदेशान्वये पदोन्नतीने सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, नांदेड या पदावर पदस्थापना देण्यात आली. तथापि, सदर पदावर कार्यरत असलेले श्री. तेजस माळवदकर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मुळ अर्ज ५६९/२०२० मध्ये मा. न्यायाधिकरणाने स्थगिती दिली. त्यामुळे श्री. आर. आर. पाटील यांना शासन आदेश दि.०१.०३.२०२१ अन्वये सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जळगाव या पदावर पदस्थापना देण्यात आली. तद्नंतर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जळगाव या पदावर श्री. योगेश पाटील यांना दि.२६.१०.२०२१ रोजीच्या आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आल्याने श्री. आर.आर. पाटील हे पदस्थापनेविना आहेत. सदर बाब विचारात घेऊन श्री. आर.आर. पाटील यांना खालील तक्त्यातील रकाना ४ येथे दर्शविल्याप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे:-

| क्र | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.आर. आर. पाटील, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ | पदस्थापनेविना | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, रायगड |

३. सदर पदस्थापना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम-४ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने करण्यात येत आहे.

४. सदर आदेशामुळे श्री. आर.आर.पाटील यांच्या मुळ सेवाज्येष्ठतेस कोणतीही बाधा येणार नाही.

५. श्री. आर.आर. पाटील यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रूजू व्हावे.

६. प्रस्तुत शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०५०२१४३२४५६४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, pseudonym=E4B65E741A4E068C8794948A6098246DB7DA095A, serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2022.05.02 14:34:22 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. आर. आर. पाटील, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (व्दारा :- आयुक्त, समाज कल्याण, पुणे)

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
३. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
४. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण
५. सर्व उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
६. मा. मंत्री/मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा. सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
११.आस्था-२ निवडनस्ती